**मा. न्या. धर्माधिकारी, निवृत्त, मुंबई उच्च न्यायालय, यांच्या अध्यक्षतेखालील समितीने केलेल्या शिफारशींच्या अंमलबजावणीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
महिला व बाल विकास विभाग
शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०११ / प्र.क्र.२१४/ का-०२
नविन प्रशासकीय भवन, ३ रा मजला,
मादम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांकः ४ ऑक्टोंबर, २०११.

**शासन परिपत्रक:-** महिलांवरील अत्याचार रोखण्यासंदर्भात प्रचलित कायद्यातील तरतूदींचा अभ्यास करणे व त्यामध्ये सुधारणा सुचविण्यासाठी महाराष्ट्र शासनाच्या गृह विभागामार्फत मा. न्या. धर्माधिकारी, निवृत्त, मुंबई उच्च न्यायालय यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्यात आलेली होती. सदर समितीने सादर केलेल्या अंतरीम अहवालातील महिला व बाल विकास विभागाशी संबंधित निवासी संस्थेतील व प्रवेशितांसंदर्भात आवश्यक ते नियम, तरतूदी करण्याबाबत केलेल्या शिफारशींच्या अनुषंगाने आवश्यक कारवाई करण्याबाबत सदरहू शासन परिपत्रकान्वये खालीलप्रमाणे निर्देश देण्यात येत आहेत :-

**१.** संस्थेतील प्रवेशितांचे पुनर्वसन करणेबाबत वेळोवळी देण्यात आलेल्या सुचनांनुसार पुनर्वसनाबाबतची कार्यवाही करण्यात यावी.

**२.** निवासी संस्थेमध्ये गरजू महिलेस २४ तास केंव्हाही दाखल करून घेण्यात यावे. गरजू महिलेस दाखल करून घेतांना जागेचा अभाव, ती अपंग आहे, ती असाध्य रोगाने किंवा मानसिकदृष्टया आजारी आहे, तिची वर्तणूक चांगली नाही इ. कारणास्तव प्रवेश नाकारण्यात येवू नये.

**३.** मानसोपचार तज्ञ, डॉक्टर वैद्यकीय अधिकारी यांचे पॅनल तयार करण्यात यावे. अशा महिलांना सर्व प्रकारची वैद्यकीय मदत मिळेल यासाठी कायमस्वरूपी व्यवस्था निर्माण करावी. यासाठी आरोग्य विभागाच्या जिल्हा शल्य चिकीत्सक किंवा तत्सम आरोग्य विभाग अधिका-यांची मदत घ्यावी. शहरातील लायन्स क्लब, रोटरी क्लब, डॉक्टर्स असोशिएशन यांचे सदर कामी सहकार्य मिळवावे.

**४.** क्षमतेपेक्षा जास्त महिलांची संख्या झाल्यास स्थलांतरीत करण्यास योग्य असलेल्या महिलांना अन्य महिला राज्यगृहात जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांच्या मान्यतेने ज्या महिला वसतिगृहात महिलांची संख्या कमी आहे व महिलेच्यादृष्टीने सोयीस्कर असे वसतिगृह आहे तेथे स्थलांतरीत करता येईल. असे स्थलांतर करतांना स्थलांतरीत करावयाच्या महिलेचे मत विचारात घेणे आवश्यक राहील. केवळ एखादी महिला संस्थेत त्रासदायक झाली आहे किंवा तिच्या वैद्यकीय उपचारासाठी संस्था प्रशासनामध्ये अडचणी निर्माण होत आहे अशा कारणामुळे महिलेचे स्थलांतर करता येणार नाही. महिलेचे दुस-या संस्थेमध्ये स्थलांतर करताना सदरचे प्रकरण स्थानिक सहव्यवस्थापन समिती पुढे ठेवून त्यांची मान्यता घेवून महिलेच्या स्थलांतराचा प्रस्ताव जिल्हा महिला व बाल विकास

अधिकारी यांचेकडे पाठवून त्यांच्या मान्यतेने व आदेशानेच महिलेचे स्थलांतर करावे. कोणत्या संस्थेत किती महिलांच्या जागा रिक्त आहे याची अद्ययावत माहिती उपलब्ध होण्यासाठी अशा संस्थानी दरमहा एकमेंकाकडे रिक्त जागांचा अहवाल पाठवावा.

**५.** प्रवेशितेस संस्थेमध्ये स्वत:हून प्रवेश घेता येतो व स्वेच्छेने गेटपास घेवून संस्थेबाहेर जाता येते. महिलेचा संस्थेस प्रवेश घेण्याचा वयोगट १६ ते ६० याप्रमाणे आहे. तथापी, निवासी संस्थेतून महिलेची सुटका तिच्या संमतीखेरीज करू नये, संस्थेच्या नियमावलीत बसत नसेल, अशावेळी योग्य ती पर्यायी व्यवस्था केल्याशिवाय तिची सुटका करू नये. ६० वर्षावरील महिलेची इतर ठिकाणी राहण्याची सोय न झाल्यास किमान ६५ वर्षापर्यंत अशा महिलांना संस्थेत ठेवण्यास व राहण्याची मुभा देण्यात येत आहे. परंतु ६० वर्षावरील महिलेस नव्याने प्रवेश देवून संस्थेत दाखल करता येणार नाही.

**६.** कोणतीही HIV/AIDS निदान चाचणी महिलेच्या अनुमतीशिवाय करू नये. एचआयव्ही / एडस् चाचणीपूर्वी व चाचणीनंतर तिचे समुपदेशन योग्य त्या यंत्रणेव्दारे करण्यात यावे तसे समुपदेशन केल्याची नोंद महिलेच्या वैयक्तीक व्यक्ती चिकीत्सा नस्तीमध्ये समुपदेशकांच्या अहवालासह करण्यात यावी .

**७.** महिलेस स्थानिक पातळीवर दवाखान्यात जाण्यासाठी, सुरूवातीला कामाच्या ठिकाणी किवा प्रशिक्षणास जाण्यासाठी व इतर कारणाने संस्थेबाहेर जाण्यासाठी संस्थेतील शिक्षिका, निदेशक, व शक्य असल्यास काळजीवाहक तिची सोबत करतील. तसेच प्रवेशिता एका संस्थेतून दुस-या संस्थेत बदलीवर पाठवितांना संरक्षण सुविधा (Escort Facility) साठी काही अतिरिक्त मनुष्यबळाची आवश्यकता भासल्यास पोलीसी गणवेशात नसलेल्या महिला पोलीस तिची सोबत करतील. यासाठी स्थानिक पातळीवर जिल्हा पोलीस अधिक्षक किंवा पोलिस उप अधिक्षक यांचे सहकार्य घ्यावे.

**८.** संस्थांमध्ये रहाणाऱ्या महिलांच्या गरजा व पुनर्वसनाबाबतचे आवश्यक कार्य लक्षात घेऊन त्यावर परिणामकारक अंमलबजावणी करण्यासाठी एक राज्यस्तरीय समिती आयुक्तालयांतर्गत खालीलप्रमाणे गठीत करण्यात येत आहे. सदर समिती तीन महिन्यातून एकदा नियमितपणे बैठक घेऊन निर्णय घेईल

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे - अध्यक्ष
२. पोलीस महानिरीक्षक, (महिला अत्याचार प्रतिबंध), पुणे - सदस्य :
३. तुरूंग महानिरीक्षक, येरवडा कारागृह, पुणे - सदस्य
४. संचालक, शिक्षण विभाग, पुणे - सदस्य
५. संचालक, व्यवसाय व तंत्रशिक्षण, पुणे - सदस्य
६. संचालक, आरोग्य विभाग, पुणे- सदस्य
७. सचिव, विधी सेवा प्राधिकरण पुणे जिल्हा पुणे - सदस्य
८. समितीचे अध्यक्ष ठरवतील त्या महिलांसाठी काम करणा-या स्वयंसेवी संस्थेच्या दोन सदस्या - सदस्य
९. उप आयुक्त (म.वि.) महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे- सदस्य सचिव

**९.** शारिरीक व मानसिकरित्या अंपग महिला ज्यांना कौटूंबिक आधार नाही, अशा महिला संस्थेत दाखल होतांना आणि वास्तव्यास असतांना विविध समस्या अनुभवतात. या महिलांना समाजाच्या मुख्य प्रवाहात आणण्यासाठी,

योग्य त्या सर्व सुविधा उपलब्ध करुन द्याव्यात. अशा महिलांच्या कल्याणासाठी त्यांना व्यावसायीक प्रशिक्षण संस्थेत वा संस्थेबाहेरील प्रशिक्षण संस्थांमध्ये देण्यात यावे. बाहेरील प्रशिक्षण संस्थेमध्ये प्रशिक्षणासाठी जाण्या -येण्याची व्यवस्था करण्याची जबाबदारी संस्थेच्या अधिक्षकांची राहील.

शारिरीक व मानसिकरित्या अपंग महिलांना भिक्षेकरी गृहामध्ये पाठवू नये किंवा ठेवू नये अशी निवृत्त न्यायमुर्ती, उच्च न्यायालय श्री. धर्माधिकारी यांचे अध्यक्षतेखालील समितीची शिफारस असल्याबाबतची बाब जिल्हयातील सर्व न्यायालयांच्या निदर्शनास आणून दयावी.

१०. ज्या महिला शासकिय संस्था, स्वयंसेवी संस्था आणि भिक्षेकरी गृहांसारख्या संस्थामध्ये राहतात, अशा महिला कुटूंबापासून विभक्त झालेल्या असतात. त्यांच्याकडे निवासाचा पुरावा, रहिवाशी दाखला, उत्पन्नाचा दाखला इ. आवश्यक पुराव्याची कागदपत्रे नसतात. अशा महिलांची संस्थेतून सुटका होताना संबंधित संस्थेचे अधिक्षक यांनी त्या महिलांना ओळखपत्र व प्रमाणपत्र देणे बंधनकारक करण्यात येत आहे. व दिलेल्या ओळखपत्राची छायांकित प्रत कार्यालयीन दप्तरी ठेवणेही बंधनकारक आहे. तसेच सदर ओळख पत्राआधारे ती महिला संस्थेत असतानांच तिला रेशनकार्ड उपलब्ध करून देण्याची प्रक्रिया पार पाडावी याबाबत अडचणी आल्यास महसुल विभागाच्या जिल्हाधिकारी, निवासी उप जिल्हाधिकारी किंवा जिल्हा पुरवठा अधिकारी अशा उच्चपदस्थ अधिका-यांचे सहकार्य घ्यावे.

११. प्रवेशितेच्या सुटकेनंतर किंवा सुटकेपूर्वी तिच्या पुनर्वसनाच्या दृष्टीने तिच्या आवडीनूसार व पात्रतेनूसार संस्थेत किंवा संस्थेबाहेर शिक्षण वा प्रशिक्षण उपलब्ध करून दयावे. प्रवेशितेचे आई-वडील, पती व नातेवाईकांचे कौटुंबीक समुपदेशन करून महिलेस कुटूंबात समाविष्ठ करून घेण्यासाठी जाणीवपूर्वक प्रयत्न करावेत व सदरचे समुपदेशन यशस्वी झाल्यास तशी नोंद महिलेच्या वैयक्तीक नस्तीमध्ये करावी. व अयशस्वी झाल्यास त्याची कारणेही नोंदवावी.

प्रवेशितेच्या पात्रतेनूसार प्रवेशितेस खाजगी, शासकीय व निमशासकीय प्राधिकरणात नोकरी मिळाल्यास तिला नोकरीसाठी पाठवावे. पाठपुरावा म्हणून तिच्या नोकरीच्या ठिकाणी परिवीक्षा अधिका-यांनी महिन्यातून एकदा भेट देवून आवश्यक तो आढावा घ्यावा. महिलेच्या कामाचे ठिकाणचे अधिकारी व कार्यालये यांचे दुरध्वनी क्रमांक उपलब्ध करून घ्यावे. महिलेस मिळणारा पगार तिच्या नावाने बँकेच्या / पोस्टाच्या खात्यामध्ये जमा करावा व त्याची माहिती संबधित महिलेस देण्यात यावी. त्याचप्रमाणे सदरची रक्कम महिला संस्था सोडून जाताना तिला काढून देण्यात यावी अथवा सदरचे खाते महिलेस पुढे चालू ठेवण्याची ईच्छा असल्यास खात्याचे पासबुक तिच्या स्वाधीन करून तिची स्वाक्षरी घेण्यात यावी.

१२. संस्थेतील महिलांच्या करमणूकीच्या गरजा भागविण्यासाठी संस्थेत दुरदर्शन संच, रेडिओ, व प्रवेशितांच्या वयोमानानूसार खेळांचे साहित्य उपलब्ध करून घ्यावे. प्रवेशितांच्या कलागुणांना वाव देण्यासाठी वर्षातून दोन वेळेस सांस्कृतीक कार्यक्रम आयोजित करावेत. त्या सांस्कृतीक कार्यक्रमाबरोबरच विविध स्पर्धाही आयोजित कराव्यात.

संगणकास विशेष महत्व असल्यामुळे प्रवेशितांसाठी संगणक संच उपलब्ध करून दयावा व महिलांना संगणकाचे प्राथमिक ज्ञान देण्यात यावे.

१३. संस्थेच्या आवारात जागा उपलब्ध असल्यास वृक्षारोपण करावे व लावलेल्या झाडांचे संगोपन करून संस्थेच्या वातावरणात उत्साह निर्माण करावा. तसेच भाजीपाला उत्पादन, रेशिम उद्योग, रोपवाटीका असे उपक्रम सुरू करून त्याद्वारे महिलांना गुंतवून ठेवावे. याकरिता कृषी विभाग, सामाजिक वनिकरण या विभागाच्या अधिका-यांचे सहकार्य घ्यावे.

१४. संस्थेत लाईट, पाणी, पंखे याची व्यवस्था करावी यासाठी सौरउर्जेचा वापर करण्यासाठी आवश्यक उपकरणे बसविण्यासाठी अंदाजपत्रकातच मागणी प्रस्तावीत करून तशी व्यवस्था करावी.

१५. संस्थेत प्रवेश दिलेल्या महिलेसोबत तिचे लहान मुल असल्यास १० वर्ष वय पूर्ण होईपर्यंत तिची मुले तिच्यासोबत ठेवण्यास परवानगी देण्यात येत आहे. अशा मुलांच्या प्राथमिक शिक्षणाची व्यवस्था अधिक्षकांनी करावयाची आहे. तसेच या मुलांचा सांभाळ करण्यासाठी संस्थेत पाळणाघर सुरू करण्यास परवानगी देण्यात येत असून या पाळणाघरात संस्थेतील इतर कर्मचा-यांची लहान मुले, आजूबाजूच्या परिसरातील नोकरी करणा-या महिलांची मुले संस्था ज्या परिसरात आहे त्या परिसरातील भौगोलिक परिस्थितीनूसार फी आकारून ठेवण्यास मुभा देण्यात येत आहे. या पाळणाघरांची व्यवस्था पाहण्यासाठी संस्थेतील महिलांना तेथेच नोकरी देवून मिळणा-या फी मधून तिला मानधन देण्यासाठी संस्था अधिक्षकांनी कार्यवाही करावी.

१६. संस्थेतील महिलांचे विवाहाद्वारे पुनर्वसन करावयाचे असल्यास महिलेसाठी अनुरूप असलेल्या वराची पूर्ण माहिती विवाहत्सुक महिलेस देण्यात यावी. गरज असल्यास अधिक्षकांसमोर दोघांची मुलाखत घडवून आणवी. वराच्या घरी प्रत्यक्ष गृहभेट देवून अहवाल तयार करावा. वराच्या घरची परिस्थिती, वातावरण यामध्ये आपल्या संस्थेतील महिला योग्य ठरू शकेल काय, व वर आर्थिकदृष्टया सक्षम आहे काय, त्याची वर्तणूक, सवयी या सर्वबाबीची योग्य चौकशी करून अधिक्षकांनी आपल्या अभिप्रायासह प्रस्ताव स्थानिक सहव्यवस्थापन समिती समोर ठेवावा व समितीची मान्यता घेवून प्रस्ताव जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांचेमार्फत त्यांच्या शिफारसीसह आयुक्तालयास आवश्यक त्या कागदपत्रासह सादर करावा. कोणत्याही परिस्थितीत आयुक्तालयाची परवानगी असल्याशिवाय विवाह लावण्यात येवू नये. विवाहास परवानगी मिळाल्यानंतर विवाहाच्या दिवशीच विवाह नोंदणी प्रमाणपत्र प्राप्त करून देण्याची जबाबदारी संस्था अधिक्षकांची राहील. त्यासाठी विवाह नोंदणी अधिका-याशी अगोदरच संपर्क साधून योग्य ते सहकार्य प्राप्त करून घ्यावे. विवाहानंतरही परिवीक्षा अधिका-यांनी महिलेच्या घरी जावून साधारणपणे तीन महिन्यातून एकदा गृहभेट दयावी. तसेच अडचणीबाबत योग्य ते समुपदेशन करावे. एक वर्षानंतर वर्षातून एकदा याप्रमाणे दोन वर्षे पाठपुरावा करून देखरेख संपवावी.

हे परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईट 201110041754322001 वर प्रसिध्द करण्यात आलेले असुन त्याचा संगणक संकेतांक क्रमांक असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

(शं. शा. पठाडे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन,

dharmadhikari samitee

प्रति,
मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. मुख्यसचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
मा. अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव (सर्व मंत्रालयीन विभाग), मंत्रालय, मुंबई
मा.महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने)
मा.प्रबंधक, उच्च न्यायालय खंडपीठ, नागपूर / औरंगाबाद (पत्राने)
मा.लोकायुक्त / मा.उपलोकायुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
महाराष्ट्र सदन, कोपर्निकस मार्ग, नवी दिल्ली-११० ००१.
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे.
सदस्य सचिव,महाराष्ट्र राज्य महिला आयोग, मुंबई
व्यवस्थापकिय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, मुंबई
पोलीस महानिरीक्षक (महिला अत्याचार प्रतिबंध ) पुणे (आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचे मार्फत)
तुरुंग महानिरीक्षक, येरवडा कारागृह पुणे (आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचे मार्फत)
संचालक, शिक्षण विभाग पुणे (आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचे मार्फत)
संचालक, व्यवसाय व तंत्रशिक्षण, पुणे (आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचे मार्फत)
संचालक, आरोग्य विभाग, मुंबई (आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचे मार्फत)
सचिव, विधीसेवा प्राधिकरण पुणे जिल्हा पुणे (आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचे मार्फत)
सर्व विभागीय आयुक्त,
आयुक्त, महानगरपालिका / नगरपालिका (सर्व) (जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांचे मार्फत)
जिल्हाधिकारी (सर्व)
मुख्य कार्यकारी अधिकारी, (सर्व) (जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांचे मार्फत)
पोलीस अधिक्षक, (सर्व) (जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांचे मार्फत)
उप आयुक्त (महिला विकास / बाल विकास / प्रशासन) महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
जिल्हा कायदेविषयक सेवा प्राधिकरणाचे प्रतिनिधी (जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांचे मार्फत)
समिती सदस्य (सर्व) (आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचे मार्फत)
जिल्हयातील महिला व बाल विकासाच्या सर्व संस्था (जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांचे मार्फत)
जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी (सर्व)
उप सचिव / कक्ष अधिकारी (विशा-६) गृह विभाग मंत्रालय, मुंबई
उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी (सर्व) महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती (का-२)

प्रति,
मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. मुख्यसचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
मा. अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव (सर्व मंत्रालयीन विभाग), मंत्रालय, मुंबई
मा.महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने)
मा.प्रबंधक, उच्च न्यायालय खंडपीठ, नागपूर / औरंगाबाद (पत्राने)
मा.लोकायुक्त / मा.उपलोकायुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
महाराष्ट्र सदन, कोपर्निकस मार्ग, नवी दिल्ली-११० ००१.
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे.
सदस्य सचिव,महाराष्ट्र राज्य महिला आयोग, मुंबई
व्यवस्थापकिय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, मुंबई
पोलीस महानिरीक्षक (महिला अत्याचार प्रतिबंध ) पुणे (आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचे मार्फत)
तुरुंग महानिरीक्षक, येरवडा कारागृह पुणे (आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचे मार्फत)
संचालक, शिक्षण विभाग पुणे (आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचे मार्फत)
संचालक, व्यवसाय व तंत्रशिक्षण, पुणे (आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचे मार्फत)
संचालक, आरोग्य विभाग, मुंबई (आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचे मार्फत)
सचिव, विधीसेवा प्राधिकरण पुणे जिल्हा पुणे (आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचे मार्फत)
सर्व विभागीय आयुक्त,
आयुक्त, महानगरपालिका / नगरपालिका (सर्व) (जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांचे मार्फत)
जिल्हाधिकारी (सर्व)
मुख्य कार्यकारी अधिकारी, (सर्व) (जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांचे मार्फत)
पोलीस अधिक्षक, (सर्व) (जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांचे मार्फत)
उप आयुक्त (महिला विकास / बाल विकास / प्रशासन) महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
जिल्हा कायदेविषयक सेवा प्राधिकरणाचे प्रतिनिधी (जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांचे मार्फत)
समिती सदस्य (सर्व) (आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचे मार्फत)
जिल्हयातील महिला व बाल विकासाच्या सर्व संस्था (जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांचे मार्फत)
जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी (सर्व)
उप सचिव / कक्ष अधिकारी (विशा-६) गृह विभाग मंत्रालय, मुंबई
उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी (सर्व) महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती (का-२)